वितरण आदेश क्र.६
सन २०१७-१८

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस
सहाय्यक अनुदान २०१७-२०१८ (अनिवार्य) (वेतन)
जून २०१७ ते डिसेंबर २०१७ ( दुसरा हप्ता )

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विप्रप्र २०१७/प्र.क्र.७० /१७ /१२ अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०७ ऑगस्ट, २०१७

वाचा :
१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७ /प्र.क्र.६८/अर्थ- ३, दि.१ एप्रिल, २०१७.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१७/ प्र.क्र.७० /२०१७/२५, दि.५ एप्रिल, २०१७.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७ /प्र.क्र.७५/अर्थ - ३, दि.१८ एप्रिल, २०१७.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०१७/ प्र.क्र.७० /२०१७/२५, दि.२० एप्रिल, २०१७.
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.यशदा २०१७ /प्रक्र.६८/१७/ १२-अ, दि.२१ एप्रिल,२०१७.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७ /प्र.क्र. ९४/अर्थ- ३, दि. ३० जून, २०१७.

**शासन निर्णय-**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकिय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी अमरावती या संस्थेच्या सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये वेतनेतर रु.२०.०० लाख व वेतने रु. १००.०० लाख अशी एकूण रु. १२०.०० लाख ( अक्षरी रुपये एक कोटी,वीस लाख फक्त ) इतकी तरतूद करण्यात आली असून त्यापैकी रु.२०.०० लाख (अक्षरी रुपये वीस लाख फक्त) एवढे लेखा अनुदान संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये एप्रिल व मे, २०१७ या दोन महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी मंजूर करण्यात आले होते. आता संदर्भाधीन क्र.४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनिवार्य सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२ डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेला संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल व मे,२०१७ या दोन महिन्यांकरिता वेतनेतर रु. ३,३३,०००/- व वेतने रु.१६,६७,०००/-असे एकूण

रु. २०,००,०००/- ( अक्षरी रुपये चवीस लाख फक्त) इतके अनिवार्य सहाय्यक अनुदान (पहिला हप्ता ) वितरित करण्यात आले आहे.

आता संस्थेस जून २०१७ ते डिसेंबर २०१७ या सात महिन्यांकरिता अनिवार्य ( वेतनेतर व वेतने ) खर्चासाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ७०% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून, अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या खर्चासाठी रु.४३,३३,००० /- ( अक्षरी रुपये त्रेचाळीस लाख,तेहत्तीस हजार फक्त ) इतके अनिवार्य सहाय्यक अनुदान ( दुसरा हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे.

३ हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने )" याखाली सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१७-२०१८ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ येथील शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ (१) (अ) मध्ये नमूद केल्यानुसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करतांना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट ( Bank Account Statement ) देयकासोबत जोडण्यात यावे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थ- ३, दि.१८ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ७ ते ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. त्या परिपत्रकातील परिच्छेद १० ते १८ मधील अटी येथे लागू होत नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०८१३११०५६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijaykumar Parshuram Soshte

Digitally signed by Vijaykumar Parshuram Soshte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=106ede43bb7dcc67e6404aaa146fb4c17a872b3754b63c343b66d6b91dd6b276, cn=Vijaykumar Parshuram Soshte
Date: 2017.08.08 13:01:35 +05'30'

( वि.प.सोष्टे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा(, महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा(, महाराष्ट्र-२, नागपूर,
३. मा. अ.मु.स. ( सेवा ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, अमरावती.
५. संचालक , डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नवीन प्रशासकीय इमारत, तपोवन रोड,अमरावती विद्यापीठासमोर,जिल्हा- अमरावती.
६. उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८. उप कोषागार कार्यालय, अमरावती.
९. वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/१२अ).